**अॅड. अनिल साखरे, विशेष शासकीय अभियोक्ता यांना शासकीय विधी विषयक कामकाजाबाबत सेवाशुल्क (वकील फी) अदा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन आदेश क्रमांक: न्यायाप्र-२०२४/ प्र.क्र.१०/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
२ रा मजला, मंत्रालय (मुख्य इमारत), मुंबई -४०००३२
दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा:-** (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विवनयम, भाग-२, दि. १७/०४/२०१५
(२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विउप्र-२०१५/प्र.क्र. २१/२०१५/विनियम, दि. १६/०६/२०१७
(३) विधी व न्याय विभागाचे दि. १६/०१/२०२४ चे पत्र
(४) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा.मुंबई) यांचे पत्र क्रमांक: व्यशिप्र-२०२४/आस्था-४/कोर्टफी/श्रीम. भुवनेश्वरी मोरे/का-४/२५, दि. २७/०२/२०२४.

**ज्ञापन :**

आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई) यांच्या संदर्भ क्र. (४) येथील पत्राच्या अनुषंगाने असे कळविण्यात येते की, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. १५६०/२०२३ श्रीमती भुवनेश्वरी मोरे व इतर विरुध्द महाराष्ट्र शासन या न्यायालयीन प्रकरणी अॅड. अनिल साखरे यांची विधी व न्याय विभागाच्या संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शासनाची बाजु मांडण्याकरीता शासकीय अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. सदर न्यायालयीन प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे अॅड. साखरे यांनी शासनाची बाजू मांडलेली असून, त्या अनुषंगाने अॅड. साखरे यांना सेवा शुल्क (वकील फी) म्हणून एकूण रु. ३,५०,०००/- (रुपये तीन लक्ष पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रकरणी येणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात “मागणी क्र. झेड ए ०२, २२३० कामगार व सेवायोजन, (००३) प्रशिक्षण, (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यावसायिक प्रशिक्षण, (०२) (०१) कारागिरांचे तांत्रिक व्यावसायिक प्रशिक्षण दत्तमत्त २२३० ए०३१ या प्रधान लेखाशिर्षाखालील (२८) व्यावसायिक सेवा” या उद्दिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत ज्ञापन वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन, अ. क्र. ४९, नियम क्र. १६६ “अ” अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आलेले आहे. त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३२८१२१७५४२३०३ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2024.03.28 12:27:27 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई)

२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर, ( लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता )

३) अवर सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

४) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पू), मुंबई-५१

५) निवडनस्ती (व्यशि-१)